**अनुसूचित जाती व नवबौध्द घटकांसाठी घरकुल योजनेची अंमलबजावणी करण्यासाठी कंत्राटी पध्दतीने कनिष्ठ अभियंता व लिपिक-टंकलेखकाची पदे मंजूर करण्याबाबत................**

महाराष्ट्र शासन
सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग
शासन निर्णय क्र.बीसीएच -२००९/प्र.क्र.१५९/मावक-२
मंत्रालय विस्तार, मुंबई ४०००३२.
दिनांक : १८ ऑक्टोंबर, २०१०

**वाचा:-**

१) शासन निर्णय ग्रामविकास व जलसंधारण विभाग, क्र.जिग्राप-२००३/प्र.क्र.१७४३/योजना-५, दि.१७.३.२००४
२) शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र.बीसीएच-२००८/प्र.क्र.३६/मावक-२, दि.१५.११.२००८
३) शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र.बीसीएच-२००९/प्र.क्र.१५९/मावक-२, दि.९.३.२०१०
४) शासन पुरकपत्र सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्र.बीसीएच-२००९/प्र.क्र.१५९/मावक-२, दि. ६.८.२०१०
५) शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्र.बीसीएच-२००९/प्र.क्र.१५९/मावक-२, दि. ३१.८.२०१०

**<u>प्रस्तावना</u> -**

ग्रामविकास व जलसंधारण विभागाच्या शासन निर्णय दि.१७.३.२००४ अन्वये जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणांना सुधारित कर्मचारी आकृतीबंध लागू करण्यात आला असून, करार पध्दतीने पदे भरण्याची परवानगी देण्यात आलेली आहे. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या शासन निर्णय दि.१५.११.२००८ अन्वये राज्यामध्ये अनुसूचित जाती व नवबौध्द घटकांसाठी घरकुल योजना लागू करण्यात आलेली आहे. सामाजिक न्याय विभागाच्या दि.९.३.२०१० च्या शासन निर्णयानुसार सदर योजनेची ग्रामीण अंमलबजावणी करण्याकरीता जिल्हा परिषदेच्या जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणेमार्फत राबविण्याचा निर्णय घेण्यात आलेला आहे. सामाजिक न्याय विभागाच्या शासन निर्णय दि.६.८.२०१० अन्वये घरकुल योजनेच्या पात्र अर्जांपैकी ज्यांची नावे दारिद्रय रेषेखालील कुटुंबाच्या यादीमध्ये समाविष्ठ आहेत त्या लाभार्थ्यांना प्रथम टप्प्यात सर्वोच्च प्राधान्य देण्याचे आदेश निर्गमित करण्यात आलेले आहेत. शासन निर्णय दि.३१.८.२०१० अन्वये याकरीता निधी संबंधित यंत्रणेकडे वितरीत करण्यात आलेला आहे. ग्रामीण भागामध्ये जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणेमार्फत बांधकाम करावयाचे असल्याने जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणेस कंत्राटी पध्दतीने कनिष्ठ अभियंता व लिपिक-टंकलेखक पदे उपलब्ध करुन द्यावीत अशा प्रकारची विनंती ग्रामविकास व जलसंधारण विभागाने केली होती. त्यास अनुसरुन कंत्राटी पध्दतीने कनिष्ठ अभियंता व लिपिक-टंकलेखकाची पदे निर्माण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u> -**

सामाजिक न्याय विभागामार्फत अनुसूचित जाती व नवबौध्द घटकांसाठी घरकुल योजना अ.क्र.२ वरील शासन निर्णय दि.१५.११.२००८ अन्वये राबविण्यासाठी मान्यता देण्यात आलेली आहे. ग्रामीण भागाकरीता सदर योजना जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणेमार्फत राबविण्याचा निर्णय घेण्यात

आलेला आहे. यासाठी जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणेच्या आस्थापनेवर खालील पदे तात्पुरत्या स्वरुपात कंत्राटी पध्दतीने भरण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | तालुका संख्या | जिल्ह्याची संख्या | मंजूर कनिष्ठ अभियंता पदे | मंजूर लिपिक-टंकलेखक पदे |
|---|---|---|---|---|
| १ | १ ते ५ | २ | ४ | ४ |
| २ | ६ ते १० | १४ | ४२ | २८ |
| ३ | ११ व त्यापेक्षा जास्त | १७ | ६८ | ३४ |
| | **एकूण** | **३३** | **११४** | **६६** |

२. या योजनेवर नेमावयाच्या कनिष्ठ अभियंताना रु.१५,०००/- (रुपये पंधरा हजार फक्त) इतके एकत्रित वेतन दरमहा व लिपिक-टंकलेखक यांना रु.५०००/- (रुपये पाच हजार फक्त) इतके दरमहा एकत्रित वेतन देण्यास सहमती देण्यात येत आहे. सदरहू पदे वित्त विभागाच्या मार्गदर्शक सूचनानुसार व ग्राम विकास व जलसंधारण विभागाच्या दि.१७.३.२००४ व शासन पत्र ग्रामविकास व जलसंधारण विभाग क्र.जिग्राप-२००७/प्र.क्र.२५/यो-५, दि.३०.३.२००७ मधील नमूद केलेल्या कार्यपध्दतीनुसार भरण्यात यावी.

३. सदर पदे ही सामाजिक न्याय विभागाची घरकुल योजना पूर्ण होईपर्यंत चालू राहतील. याकरीता येणारा खर्च सामाजिक न्याय विभागाने घरकुल योजनेकरीता (ग्रामीण) उपलब्ध करुन दिलेल्या निधीमधून करण्यात यावा.

४. हा शासन निर्णय ग्रामविकास व जलसंधारण विभागाच्या सहमतीने व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.४६५/वि.सू.,दि.१८.१०.२०१० अन्वये आणि उच्चस्तर सचिव समितीने दि.६.१०.२०१० रोजी दिलेल्या मंजूरीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेब साईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक क्रमांक २०१०१०१८१७४५४२८००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

सही/-
**( भो.गो.गोंदोळे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,
मा.राज्यपाल यांचे सचिव
मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
मा.उपमुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव
मा.मंत्री (सा.न्या.) यांचे खाजगी सचिव

मा.राज्यमंत्री (सा.न्या.) यांचे खाजगी सचिव
सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
अप्पर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग यांचे स्वीय सहाय्यक
प्रधान सचिव (ग्रामविकास), ग्रामविकास व जलसंधारण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक
प्रधान सचिव, गृहनिर्माण विभाग यांचे स्वीय सहाय्यक
महालेखापाल, महाराष्ट्र - १/२, (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर
संचालक, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य,पुणे
संचालक, लेखा व कोषागरे, मुंबई
सर्व विभागीय समाजकल्याण अधिकारी.
सर्व विशेष जिल्हा समाजकल्याण अधिकारी.
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद तथा अध्यक्ष, कार्यकारी समिती जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा
सर्व प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, जिल्हा परिषद
वित्त विभाग (व्यय-१४/अर्थोपाय,) मंत्रालय, मुंबई.
कक्ष अधिकारी, विधानमंडळ अनुसूचित जाती कल्याण समिती (ड-४), १५ वा मजला, विधानभवन, मुंबई - ४०० ०३२. (५ प्रतीसह)
महासंचालक, माहिती व प्रसिध्दी संचालनालय, मंत्रालय, मुंबई.
निवड नस्ती-मावक-२.